20110510115543001

**विकास योजना - पुणे**
महाराष्ट्र प्रादेशिक व नगर रचना
अधिनियम,
१९६६ चे कलम-३७((१ अे अे)(सी)) अन्वये
फेरबदल मंजूर करणेबाबत..
स.नं.१०४ पै व १०५ पै मौ. येरवडा

**महाराष्ट्र शासन**
नगर विकास विभाग,
मंत्रालय, मुंबई - ४०० ०३२
शासन निर्णय क्रमांक-टिपीएस-१८०९/अनौसं १८४/प्र.क्र.२०८७/०९/नवि-१३
दिनांक ०८ फेब्रुवारी २०११

**शासन निर्णय :-** सोबतची शासकिय अधिसूचना महाराष्ट्र शासन राजपत्रा मध्ये प्रसिध्द करावी.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांचे आदेशानुसार व नावाने,

( सुनिल मरळे )
अवर सचिव, महाराष्ट्र शासन.

प्रति,
विभागीय आयुक्त, पुणे विभाग, पुणे
संचालक, नगर रचना, महाराष्ट्र राज्य, पुणे.
आयुक्त, पुणे महानगरपालिका, पुणे.
जिल्हाधिकारी, पुणे
उपसंचालक नगर रचना, पुणे विभाग, पुणे
सहाय्यक संचालक नगर रचना, पुणे शाखा, पुणे.
(यांना विनंती की मंजूरीच्या अनुषंगाने अधिप्रमाणित करावयाचे भाग नकाशे ५ प्रतीत पाठविण्यांत यावेत )
व्यवस्थापक, येरवडा कारागृह मुद्रणालय, पुणे.
(त्यांना विनंती करण्यांत येते की, सोबतची शासकीय अधिसूचना महाराष्ट्र शासनाच्या राजपत्राच्या भाग-१, पुणे विभाग, पुणे पुरवणी भाग-१ मध्ये प्रसिध्द करुन त्याच्या प्रत्येकी ५ प्रती या विभागास, संचालक नगर रचना, महाराष्ट्र राज्य, पुणे, जिल्हाधिकारी, पुणे, उपसंचालक नगर रचना, पुणे विभाग, पुणे, आयुक्त, पुणे महानगरपालिका, पुणे, सहाय्यक संचालक नगर रचना, पुणे शाखा, पुणे यांना द्यावी)
कक्ष अधिकारी (नवि-२९), नगर विकास विभाग, मंत्रालय, मुंबई.
त्यांना विनंती करण्यांत येते की, सदर अधिसूचना शासनाच्या वेबसाईटवर प्रसिध्द करावी
निवडनस्ती (नवि-१३)

नगर विकास विभाग
मंत्रालय, मुंबई - ४०००३२
दि.... फेब्रुवारी २०११

## अधिसूचना

**महाराष्ट्र प्रादेशिक व नगर रचना अधिनियम, १९६६**
क्र.टिपीएस-१८०९/अनौस-१८४/प्र.क्र.२०८७/०९/नवि-१३

महाराष्ट्र प्रादेशिक व नगररचना अधिनियम १९६६

ज्याअर्थी, पुणे महानगरपालिकेची सुधारित विकास योजना (यापुढे उल्लेख "उक्त विकास योजना" असा करणेत आला आहे) महाराष्ट्र प्रादेशिक व नगर रचना अधिनियम, १९६६ चे कलम ३१(१)अन्वये शासनाच्या नगर विकास विभागाने अधिसूचना क्र.टिपीएस-१८८४/१३७७/ प्र.क्र.२२०/ ८५(iii)/नवि-७, दि.५ जानेवारी, १९८७ (यापुढे उल्लेख "उक्त अधिसूचना" असा करणेत आला आहे) अन्वये मंजूर केली असून दिनांक ५ फेब्रुवारी, १९८७ पासून अंमलात आहे;

आणि ज्याअर्थी, उक्त विकास योजनेनुसार मौजे-येरवडा स.नं.१०४पै. व १०५पै. जमीन भागशः प्राथमिक शाळा (आ.क्र.PS-81) व भागशः पार्क (आ.क्र.PK-13) या आरक्षणाने बाधित होत आहे. (यापुढे उल्लेख "उक्त आरक्षण" असा करणेत आला आहे);

आणि ज्याअर्थी, मौजे-येरवडा स.नं.१०४ व १०५ क्षेत्र ५.०३ हे. ही जमीन येरवडा कारागृह यांच्या मालकीची असून सदर जमीन गृह विभागाच्या दि.०६.०५.२००८ रोजीचे शासन निर्णय क्र.जेएलएम/ १००८/प्र.क्र.५७/पीआरएस-२ अन्वये सामाजिक न्याय विभागास डॉ.बाबासाहेब आंबेडकर न्याय भवन आणि इतर उपक्रमाचे बांधकामासाठी देण्यात आली आहे;

आणि ज्याअर्थी, संचालक, समाजकल्याण, महाराष्ट्र राज्य, पुणे यांनी उक्त आरक्षणे वगळणेबाबत त्यांचे पत्र क्र.सकसं/मावक/आरक्षण/२००९-१०/का-१२/९९३, दि.१४.०८.२००९ अन्वये शासनास विनंती केली आहे;

आणि ज्याअर्थी, संचालक, नगर रचना, महाराष्ट्र राज्य, पुणे यांचा सल्ला घेतल्यानंतर आणि आवश्यक ती चौकशी केल्यानंतर उक्त फेरबदल करणे जनहिताच्या दृष्टीने आवश्यक असलेने उक्त आरक्षणे भागशः वगळून डॉ.बाबासाहेब आंबेडकर न्याय भवन आणि इतर उपक्रमाचे बांधकाम करणेसाठी रहिवास विभागात समाविष्ट करणे आवश्यक आहे असे शासनाचे मत झाले आहे (यापुढे उल्लेख "उक्त प्रस्तावित फेरबदल" असा केला आहे);

आणि ज्याअर्थी, वरील वस्तुस्थिती आणि उक्त अधिनियमाच्या कलम ३७(१अे) अन्वये प्राप्त असलेल्या अधिकारात शासनाने सूचना क्र.टिपीएस-१८०९/अनौस.१८४/प्र.क्र.२०८७/२००९/नवि-१३, दि.२८.५.२०१० (यापुढे उल्लेख "उक्त सूचना" असा केला आहे) अन्वये आम जनतेकडून उक्त फेरबदलासंदर्भात सूचना/हरकती मागविण्यासाठी प्रसिद्ध केली आहे;

आणि ज्याअर्थी, शासनाने उक्त नोटीस महाराष्ट्र शासन राजपत्रात दि.१.७.२०१० रोजी प्रसिद्ध केली आहे. तसेच उक्त नोटीस "इकॉनॉमिक टाईम्स" मध्ये दि.७.१०.२०१० व "सांज समाचार" मध्ये दि.१३.१०.२०१० रोजी प्रसिद्ध केली आहे.

आणि ज्याअर्थी, शासनाने उक्त सूचनेद्वारे उपसंचालक, नगर रचना, पुणे विभाग, पुणे, स.नं.७४/२, सहकारनगर, बँक ऑफ महाराष्ट्राच्या वर, पुणे-४११००९ यांना विहीत मुदतीत प्राप्त होणाऱ्या सूचना/हरकतदारांना व पुणे महानगरपालिकेस (यापुढे उल्लेख "उक्त महानगरपालिका" असा केला आहे) सुनावणी देऊन अहवाल सादर करण्याकरीता उक्त अधिनियमातील कलम १६२ अन्वये नियुक्त केले आहे;

आणि ज्याअर्थी, उक्त अधिनियमाच्या कलम ३७(१अे) अन्वये वैधानिक कार्यवाही पूर्ण करून आणि प्राप्त सूचना/हरकतदारांना सुनावणी देऊन नियुक्त अधिकारी यांनी त्यांचा अहवाल दि.१८.११.२०१० रोजी शासनास सादर केला आहे;

आणि ज्याअर्थी, संचालक, नगर रचना, महाराष्ट्र राज्य, पुणे यांच्याशी सल्लामसलत केल्यानंतर व आवश्यक ती चौकशी केल्यानंतर उक्त फेरबदल आवश्यक असून तो मंजूर करणे आवश्यक आहे, असे शासनाचे मत आहे;

त्याअर्थी, उक्त अधिनियमाच्या कलम ३७(१अे)(सी) अन्वये प्रदत्त असलेल्या अधिकारात उक्त फेरबदल मंजूर करीत असून, त्याकरीता उक्त विकास योजनेत खालीलप्रमाणे बदल करण्यात येत आहे.

उक्त मंजूर विकास योजनेच्या अधिसूचनेमधील शेवटच्या नोंदीनंतर खालीलप्रमाणे खालीलप्रमाणे नवीन नोंद समाविष्ट करण्यात येत आहे.

**नोंद**

मौजे-येरवडा स.नं.१०४पै. व १०५पै. जमीन भागश: प्राथमिक शाळा (आ.क्र.PS-81) व भागश: पार्क (आ.क्र.PK-13) ही आरक्षणे वगळून त्याखालील क्षेत्र डॉ. बाबासाहेब आंबेडकर न्यायभवन व इतर उपक्रमाचे बांधकाम करण्यासाठी रहिवास विभागात समाविष्ट करण्यात येत आहे.

**टिप :-**

१) उक्त फेरबदल दर्शविणारा भाग नकाशा आम जनतेच्या अवलोकनार्थ पुणे महानगरपालिकेच्या कार्यालयात कामकाजाच्या दिवशी कार्यालयीन वेळेत उपलब्ध राहील.

२) उक्त फेरबदल, सदरची अधिसूचना महाराष्ट्र शासन राजपत्रात प्रसिद्ध झाल्यांनतर अंमलात येईल.

३) सदर अधिसूचना शासनाच्या www.urban.maharashtra.gov.in या वेबसाईटवर प्रसिद्ध करण्यात आली आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

( सुनिल मरळे )
अवर सचिव, महाराष्ट्र शासन

**Maharashtra Regional and Town Planning Act, 1966.**

---

**Notification under section 37(1AA)(c) S.No. 104(pt) and 105(pt) of Yerwada.**

**GOVERNMENT OF MAHARASHTRA**
**Urban Development Department**
**Mantralaya, Mumbai 400 032.**

**Dated १२.. February, 2011.**

**NOTIFICATION**

**Maharashtra Regional & Town Planning Act 1966.**

**No. 1809/UOR-184/CR-2087/09/UD-13**

Whereas the Development Plan of Pune (hereinafter referred to as "the said Development Plan") has been sanctioned by Government in Urban Development Department, vide Notification No. TPS 1884/1377/CR-220/85 (iii)/UD-7 dated 5th January, 1987 (hereinafter referred to as the "said Notification") so as to come into force with effect from 5th February, 1987;

And whereas, in the said Development Plan land bearing S.No. 104(pt) and 105(pt) of Yerwada has been reserved for Primary School (Site No.PS-81) and Park (Site No.PK-13) (hereinafter referred to as "the said Reservation");

And whereas, the area approximately 5.03 ha. from land bearing S.No. 104(pt) and 105(pt) is owned by Yerwada Central Jail and the said land has been granted to Social Justice Department vide their Home Department decision No. JLM/1008/CR-57/PRS-2, dated 6/5/2008 for construction of Babasaheb Ambedkar Justice Bhavan and other activities;

And whereas, The Director of Social Welfare Department has requested Government to delete the said reservation vide letter No. सकस/मावक/आरक्षण/२००९-१०/का-१२/९९३ dated 14/8/2009;

And whereas, after consulting the Director of Town Planning, Maharashtra State, Pune and after making necessary enquiries Government is of the opinion to delete the part of said reservations and to include the said land in Residential Zone to fulfill the objective of development of Dr. Babasaheb Ambedkar Justice Bhavan and other activities. Government is also of the opinion that the said modification is in the public interest (hereinafter referred to as "the said proposed modification");

And whereas, in view of the facts and circumstances mentioned above and in exercise of the powers vested under sub-section (1AA) of section 37 of the said Act, Government has published a notice No. TPS-1809/UOR-184/CR-2087/2009/UD-13 dated 28/5/2010 (hereinafter referred to as "the said Notice") for inviting suggestions and objections from any person with respect to the said modification;

And whereas, the said notice was published in the Government Gazette dated 1/7/2010 and said notice is published in newspaper namely Economic Times dated 7/10/2010 and Sanj Samachar dated 13/10/2010;

And whereas, as per the said notice, Government has appointed Deputy Director of Town Planning, Pune Division, Pune, as an officer under section 162 of the said Act (hereinafter referred to as "the said Officer") to scrutinize any suggestions/objections received, grant hearing to the person who have submitted suggestions and objections including Pune Municipal Corporation (hereinafter referred to as "the said Corporation") and submit his report to the government regarding the said modification;

And whereas, after completing the procedure as laid down under section 37(1AA) of the said Act and giving hearing to the concerned persons on the suggestions and objections received said officer has submitted his report to Government on 18/11/2010;

And whereas, Govt. of Maharashtra after making necessary enquirieis and after consulting the Director of Town Planning, Maharashtra State, Pune is satisfied that the said Modification is necessary and shall b e sanctioned;

Now therefore in exercise of the powers conferred under section (1AA)(c) of section 37 of the said Act, the Government of Maharashtra hereby sanctions the modification proposal and for that purpose modifies the said Development Plan as follows:

After the last entry, following new entry is added in the said notification sanctioning the said Development Plan.

**ENTRY**

"The reservations on the land bearing S.No. 104(pt) and 105(pt) of Yerwada Primary School (Site No.PS-81) and Park (Site No.PK-13) is deleted and included in Residential Zone for the purpose of development of Dr. Babasaheb Ambedkar Justice Bhavan and Other activities as shown on plan".

**Note:**

A) The aforesaid modification to the said Development Plan is kept open for inspection of the public during office hours in the office of the Pune Municipal Corporation, Pune.

B) Fixes the date of publication of this notification in the Government Gazette as the date of coming into force of this notification.

C) This notification is also published on Government web site.

By order and in the name of the Governor of Maharashtra,

(Sunil Marale)
Under Secretary to Government.